**उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील शासकीय अध्यापक महाविद्यालयातील सहाय्यक प्राध्यापक या पदाच्या सन २०१८ मधील बदल्यांबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांकः बदली-२०१८/(९२/१८)/मशि-१**
मंत्रालय विस्तार, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०० ०३२.
तारीख : १२ जून, २०१८.

**आदेश**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियम आणि शासकीय कर्तव्य पार पडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४(५) मध्ये विहीत केलेल्या तरतूदीस अनुसरुन खालील विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे सहाय्यक प्राध्यापक, शासकीय अध्यापक महाविद्यालय यांच्या परिणामस्वरूपत: (Resultant) बदल्या करण्यात येत आहेत.

| अ. क्र. | सहाय्यक प्राध्यापकाचे नांव | विषय | सध्या कार्यरत असलेले महाविद्यालय/संस्था | बदलीचे ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| १ | श्री. वैजनाथ रघुनाथ गंदगे | भूगोल | शासकीय अध्यापक महाविद्यालय, भंडारा | शासकीय अध्यापक महाविद्यालय, यवतमाळ | विनंती |
| २ | श्री. दादाराव भुमाजी इंगोले | भूगोल | शासकीय अध्यापक महाविद्यालय, यवतमाळ | शासकीय अध्यापक महाविद्यालय, भंडारा | विनंती |
| ३ | डॉ. एच. पी. खोब्रागडे | मराठी | शासकीय अध्यापक महाविद्यालय, अंबेजोगाई | शासकीय अध्यापक महाविद्यालय, बुलढाणा | विनंती |
| ४ | श्रीम. कल्पना आदिनाथ बेलोकर | मराठी | शासकीय अध्यापक महाविद्यालय, नांदेड | शासकीय अध्यापक महाविद्यालय, अंबेजोगाई | विनंती |

बदलीच्या आदेशाची अंमलबजावणी तात्काळ होण्याकरीता संबंधित प्राचार्यांनी खालील सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

१. बदलीबाबतचे आदेश प्राप्त झाल्यानंतर संबंधित प्राचार्यांनी बदली झालेल्या सहाय्यक प्राध्यापकांना बदलीच्या ठिकाणी रूजू होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त व्हावे.
२. पदस्थापनेत बदल करण्यासंदर्भात कोणत्याही विनंतीची दखल घेण्यात येणार नाही. बदलीच्या आदेशात बदल करुन घेण्यासाठी कोणत्याही सहाय्यक प्राध्यापक यांनी प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास असे सहाय्यक प्राध्यापक शिस्तभंगविषयक कारवाई करण्यास पात्र ठरतील.
३. बदली झालेल्या ठिकाणी रुजू होईपर्यंतच्या कालावधीत कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करण्यात येणार नाही.

४. सदर बदल्यांची अंमलबजावणी प्रभावीपणे होणे गरजेचे असल्यामुळे बदली झालेल्या सहाय्यक प्राध्यापक यांच्या कार्यमुक्ततेच्या दिनाकांपर्यंत अथवा जास्तीत जास्त **दिनांक ३०.०६.२०१८** पर्यंतचे वेतन ते सध्या कार्यरत असलेल्या शासकीय अध्यापक महाविद्यालयाने काढावे. त्यानंतरचे वेतन कोणत्याही परिस्थितीत बदलीपुर्वीच्या शासकीय अध्यापक महाविद्यालयाकडून काढण्यात येऊ नये, सदर वेतन संबंधित सहाय्यक प्राध्यापक बदलीच्या शासकीय अध्यापक महाविद्यालयात रुजू झाल्यानंतर बदलीनंतरच्या महाविद्यालयाने काढावे. **दिनांक ०१.०७.२०१८** पासूनचे वेतन बदलीपुर्वीच्या कार्यरत असलेल्या शासकीय अध्यापक महाविद्यालयातून काढण्यात आल्यास त्या शासकीय अध्यापक महाविद्यालयातील आंहरण व संवितरण अधिकारी यांना व्यक्तीश: जबाबदार धरण्यात येईल.

५. हे आदेश तात्काळ अंमलात येतील. बदली झालेले सहाय्यक प्राध्यापक कार्यमुक्त होऊन बदलीच्या ठिकाणी रुजू झाल्याबाबतचा अहवाल संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी **दिनांक ०१.०७.२०१८** पूर्वी शासनास सादर करावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६१२११०३५६९२०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Manisha Pravin Kini

Digitally signed by Manisha Pravin Kini
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=108cbdac08c7e940866a8fc97bfe7f861bf192ce9dd6b4d0924623149a51f9ed, cn=Manisha Pravin Kini
Date: 2018.06.12 11:03:46 +05'30'

(म.प्र.किणी)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
२. सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण
३. सर्व प्राचार्य, शासकीय अध्यापक महाविद्यालये
४. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
७. संबंधित सहाय्यक प्राध्यापक, शासकीय अध्यापक महाविद्यालय
८. निवड नस्ती.

**प्रत** :- १. मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव.
२. मा. राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव.